**राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत कंत्राटी पदांना सामाजिक आरक्षण लागू करणेबाबत**

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन निर्णय क्रमांकः पीएचडी ३००११ / १७९/ २०१४- आ-७

बी. विंग, १० वा मजला, गो. ते. रूग्णालय संकूल इमारत
नवीन मंत्रालय, मुंबई - ४००००१
तारीख: ०८ जुलै, २०१५

वाचा -

1) **शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग क्रमांकः बीसीसी २०१३ / प्र. क्र. ३५४/भाग-२/२०१३/१६-ब, दि. २१ फेब्रुवारी ,२०१५,**
2) **आयुक्त (कु.क.) तथा संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान यांचे पत्र क्र. राआसो/ आस्था/कंत्राटी कर्मचारी/ सामाजिक आरक्षण / १४५६८/१३, दि. ०३ जून, २०१३**

प्रस्तावना -

केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार राज्यामध्ये केंद्रपुरस्कृत राष्ट्रीय आरोग्य अभियान कार्यान्वित असून या अभियानामध्ये राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियान, राष्ट्रीय नागरी आरोग्य अभियान आणि राष्ट्रीय रोगनियंत्रक/ प्रतिबंध कार्यक्रम या योजनांचा समावेश होतो. राष्ट्रीय आरोग्य अभियानास केंद्र शासनाने सन २०१२-२०१७ या पंचवर्षिक योजनेच्या कालावधीसाठी मुदतवाढ दिली आहे. राष्ट्रीय आरोग्य अभियानाच्या प्रभावी अंमलबजावणीकरीता मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली राज्य आरोग्य सोसायटीची स्थापना करण्यात आली असून सदर सोसायटीच्या माध्यमातून केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार मुक्त व्यवस्थेमार्फत जाहिरात देऊन शैक्षणिक अर्हता, अनुभव व वय इत्यादी पात्रता तपासून विविध स्वरूपाच्या कंत्राटी नियुक्त्या मर्यादित कालावधीसाठी केल्या जातात. सदर कंत्राटी तत्वावरील पदांना सामाजिक आरक्षण लागू करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. याबाबत पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

## शासन निर्णय-

महाराष्ट्र अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, विमुक्त जाती, भटक्या जमाती, विशेष मागास प्रवर्ग आणि इतर मागास वर्ग आरक्षण अधिनियम २००१ हा ४५ दिवसांपेक्षा अधिक कालावधीकरीता

देण्यात येणा-या/आलेल्या सर्व कंत्राटी नियुक्त्यांना/ पदांना लागू असल्यामुळे राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत राज्य आरोग्य सोसायटीमार्फत देण्यात येणा-या सर्व कंत्राटी तत्वावरील नियुक्तीसाठी/पदांसाठी खालीलप्रमाणे सामाजिक आरक्षण लागू करण्यात येत आहे.

| **क्र.** | **जातीचा प्रवर्ग** | **आरक्षित पदांची टक्केवारी ( %)** |
|---|---|---|
| १ | अनुसूचित जाती | १३ % |
| २. | अनुसूचित जमाती | ७ % |
| ३. | विमुक्त जाती ( अ) | ३ % |
| ४. | भटक्या जमाती ( ब ) | २.५ % |
| ५. | भटक्या जमाती ( क) | ३.५ % |
| ६. | भटक्या ज्माती (ड ) | २ % |
| ७. | विशेष मागास प्रवर्ग | २ % |
| ८. | इतर मागास वर्ग | १९ % |
| **एकूण** | | **५२ %** |

सदर शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग यांच्या अनौपचारीक संदर्भ क्र अनौ.संक्र. ४११-१६ ब, दि. ३०.११.२०१४ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०७०८११४३२७०११७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Manohar Sadhu Thombare

Digitally signed by Manohar Sadhu Thombare
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Manohar Sadhu Thombare
Date: 2015.07.08 13:15:16 +05'30'

**मनोहर ठोंबरे**
**महाराष्ट्र शासनाचे अवर सचिव**

प्रत,

१) मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव, राजभवन , मुंबई

२) मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
३) मा. मंत्री, सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण, मंत्रालय, मुंबई.
४) मा. राज्यमंत्री, सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण, मंत्रालय, मुंबई
५) मा. लोकसभा सदस्य / राज्य सभा सदस्य, महाराष्ट्र (सर्व)
६) मा. विधान सभा सदस्य / विधान परिषद सदस्य (सर्व)
७) आयुक्त (कुटुंब कल्याण ) तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
८) संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
९) अतिरिक्त संचालक, राज्य कुटुंब कल्याण कार्यालय, पुणे
१०) महालेखापाल, लेखापरिक्षा , महाराष्ट्र -१ मुंबई, महाराष्ट्र -२ नागपूर.
११) महालेखापाल , लेखा व अनुजेयता , महाराष्ट्र -१ मुंबई, महाराष्ट्र -२ नागपूर.
१२) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१३) कोषागार अधिकारी ( सर्व जिल्हा)
१४) सामान्य प्रशासन विभाग ( १६- ब) , मंत्रालय, मुंबई.
१५) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६) आदिवासी विकास विभाग , मंत्रालय, मुंबई.
१७) सह सचिव / उपसचिव , सार्वजनिक आरोग्य विभाग यांचे स्वीय सहायक ( सर्व)
१८) अवर सचिव/ कक्ष अधिकारी, सार्वजनिक आरोग्य विभाग ( सर्व)
१९) उपसंचालक, आरोग्य सेवा मंडळ ( सर्व )
२०) जिल्हा शल्य चिकित्सक ( सर्व )
२१) जिल्हा आरोग्य अधिकारी (सर्व )
२२) निवडनस्ती ( आरोग्य- ७ )